**ई-प्रकल्प राबविण्याकरिता प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee) गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-१४१८/प्र.क्र.२१३/का-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २४ डिसेंबर, २०१८.

**वाचा -**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. सीओएम १००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दि.२९ ऑक्टोबर, २००१
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.डीआयटी/फाईल ०५/१००/३९, दि.२९ ऑक्टोबर, २००५
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. मातंस/२०११/प्र.क्र.१२५/३९, दि.२३ सप्टेंबर, २०११

**प्रस्तावना :-**

राज्याचे प्रशासन अधिक गतिमान तसेच लोकाभिमुख करण्याच्या दृष्टीने राज्याचे ई-प्रशासन धोरण संदर्भाधीन अनु.क्र.३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे. शासकीय विभाग/ कार्यालयातील कामकाजाचे संगणकीकरण करण्यासाठी दि.२९.१०.२००१ च्या शासन निर्णयान्वये सर्वसमावेशक कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. तसेच, सदर शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयांतर्गत संगणकीकरणाचे प्रकल्प राबविण्याकरिता प्रत्येक प्रशासकीय विभागामध्ये प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्याचे निर्देश देण्यात आले आहे. त्यानुसार अल्पसंख्याक विकास विभाग आणि विभागाच्या अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयांचे ई-प्रशासन प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee) गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

अल्पसंख्याक विकास विभाग आणि विभागाच्या नियंत्रणाखालील क्षेत्रीय कार्यालयांचे ई-प्रकल्प राबविण्याकरीता खालीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee) गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग | अध्यक्ष |
| २ | उप सचिव, नियोजन विभाग | सदस्य |
| ३ | उप सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ४ | संचालक, माहिती तंत्रज्ञान विभाग | सदस्य |
| ५ | उप सचिव (उद्योग), उद्योग, उर्जा व कामगार विभाग | सदस्य |
| ६ | राष्ट्रीय सुचना केंद्राचे अधिकारी (NIC), | सदस्य |
| ७ | समिती समोर विचारार्थ विषयाशी संबंधित कार्यासनाचे सह सचिव/उप सचिव | सचिव |
| ८ | आस्थापना कार्यासनाचे अवर सचिव | सदस्य सचिव |
| ९ | निमंत्रित तज्ञ आवश्यकतेनुसार | |

२. या समितीस ई-प्रशासन प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक ते हार्डवेअर/ सॉफ्टवेअर उपलब्ध करण्याकरीता सल्लागार/पुरवठादाराची निवड व इतर अनुषंगिक बाबी याबाबत निर्णय घेण्याचे अधिकार तसेच, संदर्भाधीन अनु.क्र.३ येथील दि.२३ सप्टेंबर, २०११ अनव्ये निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.१२.७ मधील तरतूदीनुसार रु.१० लाखापेक्षा जास्त व रु. ५ कोटी पेक्षा कमी खर्चाच्या निविदा प्रकल्पांना मान्यता देण्याचे अधिकार असतील.

३. प्रकल्प अंमलबजावणी समितीद्वारे मंजूर झालेल्या प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ च्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, मधील भाग पहिला, उप-विभाग तीनच्या अनुक्रमांक चार, परिच्छेद क्रमांक २७ (२) नुसार राहतील.

४. सदर शासन निर्णयानुसार गठीत करण्यात आलेल्या समितीने मान्यता दिल्यानंतर ई-प्रशासनाच्या अनुषंगाने आवश्यक बाबी जसे की, संगणक प्रणालींचे विकसन, दुरुस्ती, सुधारणा/ वेबइसाईट Host करणे या संदर्भाधीन शासन निर्णयानुसार व वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या शासन निर्णय/परिपत्रकांनुसार निश्चित केलेल्या धोरणानुसार करण्यात याव्यात.

५. या विभागातील ज्या कार्यासनांशी संबंधित किंवा त्यांचे अधिनस्त क्षेत्रिय कार्यालयाशी संबंधित विषयांचे वेबसाईटचे काम असेल तर त्या कार्यासनांनी प्रकल्प अंमलबजावणी समितीची बैठक आयोजित करुन त्यासमोर त्यांचा प्रस्ताव सादर करणे आणि तद्नुषंगाने आवश्यक ती पुढील कार्यवाही करणे आवश्यक राहील.

६. सदर समितीच्या आवश्यकतेनुसार वेळोवेळी बैठका घेण्यात याव्यात.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२४१५३६४१५६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, 2.5.4.45=032100CD9D66225CED8BAE27E0E1249D39EC14A54419D0A13504B49333B23F92B58199, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2018.12.24 15:40:49 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. राज्य सुचना अधिकारी, राष्ट्रीय सुचना केंद्र, महाराष्ट्र,११ वा मजला,नवीन प्रशासन भवन, मुंबई
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सह सचिव / उप सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई.
११. व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्या.मुंबई
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई.
१३. अधिक्षक, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद
१४. अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य, उर्दु साहित्य अकादमी, मुंबई.
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य, वक्फ बोर्ड, औरंगाबाद
१६. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवडनस्ती/का-१.